**लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेमध्ये बायोमेट्रीक पद्धतीचा वापर करून शिधावस्तू वितरण**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साविबा २०१५/प्र.क्र.२०/सं.क.**
मादाम कामा मार्ग, राजगुरू हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख:- ११ मार्च, २०१५

**वाचा :-**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ (२०१३ चा २०)

**प्रस्तावना -**

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.१९६/२००१ मध्ये दिनांक १४.९.२०११ रोजी लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे End to End Computerization बाबत विस्तृत आदेश दिले आहेत. या अनुषंगाने केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशानुसार NIC दिल्लीच्या Common Application Software (CAS) द्वारे राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या संगणकीकरणाचा Mission Mode प्रकल्प राबविण्यात येत आहे. हा प्रकल्प दोन टप्प्यात राबविण्यात येत असून Component-I मध्ये भारतीय अन्न महामंडळामधून धान्य उचलून त्याचे शासकीय गोदामापर्यंतच्या वाहतूकीचे संनियंत्रण, सर्व शिधावाटप कार्यालयातील कामाचे संगणकीकरण व लाभार्थ्यी कुटुंबाला संगणकीकृत शिधापत्रिका देणे याबाबींचा समावेश आहे.

Component-I च्या रू.६९.७३ कोटी खर्चाच्या प्रस्तावास केंद्र शासनाने मान्यता दिली असून या खर्चाच्या ५०% रक्कम केंद्र शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येत आहे.

Component-II मध्ये रास्तभाव दुकानातील व्यवहाराचे संगणकाद्वारे व्यवस्थापन (Automation) करण्यात येणार आहे. यामध्ये रास्तभाव दुकानातून लाभार्थ्याची बायोमेट्रीक ओळख पटवून त्यांना शिधावस्तूचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

## शासन निर्णय-

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम (NFSA), २०१३ राज्यात लागू झाला असल्याने, राज्य शासनाने बारकोडेड संगणकीकृत शिधापत्रिका कुटुंबातील वरिष्ठ महिलेच्या नांवे (राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियमानुसार वरिष्ठ महिला) व फोटोसह तसेच कुटुंबातील सर्व लाभार्थ्याच्या आधार क्रमांकाच्या समावेशासह देण्याचा व रास्तभाव दुकानातून शिधावस्तूचे वितरण करताना लाभार्थ्याची बायोमेट्रीक ओळख पटवून करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. राज्यात आधार नोंदणी ८०% पर्यंत झालेली असल्याने शिधापत्रिकाधारकांना संगणकीकृत शिधापत्रिका देण्यासाठी लाभार्थ्यांचे आधार क्रमांक, बँक खाते क्रमांक व मोबाईल क्रमांक यासह तसेच अन्य माहिती संकलित करण्यात येईल. ही माहिती संकलित करण्यासाठी शहरी भागामध्ये रास्तभाव

दुकानदारांचा ऐच्छीक सहभाग घेऊन त्यांना प्रत्येक शिधापत्रिकेची माहिती संकलित करण्यासाठी रू.५/- प्रमाणे मानधन अनुज्ञेय करण्यात येत आहे. तसेच ग्रामीण भागात सदर काम महसुली यंत्रणेमार्फत करून घेण्यात येईल व या कामासाठी संकलन कर्त्यास रू.५/- प्रती शिधापत्रिका मानधन अनुज्ञेय करण्यात येत आहे.

३. रास्त भाव दुकानातून लाभार्थ्यांना शिधावस्तू वितरीत करतांना मोबाईल टर्मिनल टेक्नॉलॉजीचा वापर करण्यात येणार असून त्यासाठीच्या रू.१०३.९९ कोटी खर्चाच्या प्रकल्पास शासनाने मान्यता दिली आहे. या टर्मिनलद्वारे लाभार्थ्यांची ओळख आधारक्रमांकाचा बायोमेट्रीक डाटा वापरून करण्यात येईल. ज्या लाभार्थ्यांकडे आधार क्रमांक/आधार नोंदणी क्रमांक नाही, तो या योजनेपासून वंचित राहणार नाही यांची काळजी घेण्यात येत आहे.

४. राज्यातील लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे End to End Computerization यशस्वीपणे पूर्ण होण्यासाठी सेवा सल्लागाराची नेमणूक करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सेवा सल्लागाराची नेमणूक विहित कार्यपध्दतीनुसार व माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या मार्गदर्शनाने करण्यात येईल.

५. रास्त भाव दुकानातून मोबाईल टर्मिनल टेक्नॉलॉजीच्या अंमलबजावणीबाबत स्वतंत्रपणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येतील.

६. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. ३, ३४५१, सचिवालय-आर्थिक सेवा या लेखाशिर्षाखाली खालील राज्य हिस्सा - (संगणक संकेतांक -३४५१ ३०९२) व केंद्र हिस्सा (संगणक संकेतांक -३४५१ ३०८१) या मधून करण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११४४६५४८१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Shiv Kapoor

Digitally signed by Deepak Shiv Kapoor
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICES, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Deepak Shiv Kapoor
Date: 2015.03.11 14:58:06 +05'30'

**(दीपक कपूर)**
**शासनाचे सचिव**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव,
५. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
९. सर्व प्रशासकीय विभागाचे सचिव,
१०. सर्व विभागीय आयुक्त,
११. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गो/वा),मुंबई,
१२. सर्व जिल्हाधिकारी,
१३. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
१४. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१५. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
१६. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
१७. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
१८. सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
२०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
२१. मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
२२. सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
२३. सर्व विरोधी पक्षनेते.
२४. निवड नस्ती (सं.क.)